**प्रत्येक प्रशासकीय विभागाने सन २०१७ ते २०१९ या ३ वर्षांच्या कालावधीमध्ये ५० कोटी वृक्ष लागवड, संगोपन आणि देखभाल या कार्यक्रमांतर्गत दिलेल्या उद्दिष्टासंदर्भात वर्षनिहाय नियोजन आराखडा व कृती कार्यक्रम तयार करुन अंमलबजावणी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक :- संकीर्ण-२०१६/प्र.क्र.५०१/रस्ते-७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ जानेवारी , २०१७.

वाचा :- **१.** शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक: साववि-२०१५ / प्र.क्र.१३१/ फ-११, दि. ३१.०३.२०१६.
**२.** शासन परिपत्रक सार्वजनिक बांधकाम विभाग: क्रमांक-संकिर्ण २०१६/प्र.क्र.२३७/रस्ते-१, दि. १६.०६.२०१६
**३.** शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक: साववि-२०१६/प्र.क्र.८०/फ-११, दि. १० ऑक्टोबर, २०१६ ( प्रत सोबत-दि. ३१ मार्च, २०१६ या शासन निर्णयासह )

परिपत्रक -

१. जागतिक तापमानातील वाढ, हवामान आणि ऋतू बदल याची दाहकता आणि तीव्रता कमी करण्यासाठी मोठया प्रमाणात वृक्ष लागवड हाती घेण्याचे महत्त्व वैश्विक स्तरावर मान्य झालेले आहे. ह्या उपक्रमाचा भाग म्हणून संदर्भ क्र. १ येथे नमूद शासन निर्णयान्वये दि. १ जुलै, २०१६ रोजी एकाच दिवशी २ कोटी वृक्ष लागवड करण्याचा महत्वाकांक्षी आणि धडक कार्यक्रम शासनाने हाती घेतला होता. यामध्ये **सार्वजनिक बांधकाम विभागासह** इतर शासकीय विभाग समाविष्ट झाले होते. त्याचबरोबर **सार्वजनिक बांधकाम** विभागांतर्गत क्षेत्रिय यंत्रणांनी करावयाची कार्यवाहीबाबत सविस्तर सूचना संदर्भ क्र. २ येथे नमूद शासन परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आल्या होत्या.

२. त्याचबरोबर दि. १ जुलै, २०१६ च्या कार्यक्रमामध्ये शाळा, महाविद्यालये, विद्यापीठे, एन. एस. एस., एन. सी. सी., स्काऊट ॲन्ड गाईडस्, अशासकीय संस्था, स्वयंसेवी संस्था, सामाजिक क्षेत्रामध्ये काम करणाऱ्या संस्था, औद्योगिक समूह, सीएसआर, लोकप्रतिनिधी, गृहनिर्माण संस्था, सहकारी संस्था, शासकीय कर्मचारी व अधिकारी इत्यादींचा देखील सहभाग संबंधित विभागांनी घेतला होता.

३. लोकांच्या स्वयंस्फूर्त सहभागामूळे २ कोटी वृक्षारोपणाचे उद्दिष्ट सहजगत्या पूर्ण झाले. दि. १ जुलै रोजी एकंदर २.८२ कोटी वृक्ष लागवड करण्यात आली. हा कार्यक्रम लोकचळवळीमध्ये रूपांतरीत करण्यास शासनास चांगले यश प्राप्त झाले आहे. मा. पंतप्रधान यांनी दि. ३१ जुलै, २०१६ रोजीच्या मन की बात या रेडिओवरून प्रसारित होणाऱ्या कार्यक्रमामध्ये वन विभागामार्फत राबविण्यात आलेल्या २ कोटी वृक्षारोपण कार्यक्रमाच्या अंमलबजावणीबाबत अभिनंदन केले. त्याचबरोबर यापुढील वर्षांमध्ये हाती घेण्यात येणाऱ्या कार्यक्रमाबाबत देखील सूतोवाच केले. त्याशिवाय निरनिराळया धर्मग्रंथामध्ये नमूद वृक्ष लागवडीचे महत्त्व विशद केले. त्यानुसार वृक्ष लागवडीच्या कार्यक्रमात सातत्य ठेवण्याबाबत आवाहन केले.

४. त्याचप्रमाणे लिम्का बुक ऑफ रेकॉर्ड या संस्थेने या अभिनव उपक्रमाची नोंद घेऊन राज्य शासनास प्रमाणपत्र दिले आहे. आपल्या सर्वांच्या एकत्रित प्रयत्नामुळे हा आगळावेगळा उपक्रम राबविणे शक्य झाले आहे.

५. ब्राझील मधील रिओ दि जानेरो येथे दि. ६ ऑगस्ट, २०१६ रोजी ऑलंम्पिक सोहळयाचे उदघाटन अत्यंत दिमाखदारपणे संपन्न झाले. ह्या जागतिक सोहळ्यात २०५ देश सहभागी झाले होते. भारतीय खेळाडू देखील मोठ्या संख्येने यात सहभागी झाले होते. या दिवशी वृक्षलागवडीचे महत्त्व, पर्यावरणाचे रक्षण आणि जागतिक तापमानात होणाऱ्या वाढीची तीव्रता कमी करणे (Mitigation of Global Warming) इत्यादी संदर्भातील महत्त्व विशद करणाऱ्या संदेशांचे दमदार सादरीकरण झाले. त्यानंतर ऑलंम्पिक २०१६ या स्पर्धेची सुरूवात करण्यात आली. यावेळी दिलेले संदेश पुढीलप्रमाणे:-

**पृथ्वीचा होत असलेल्या हानीला थांबविणे पुरेशे नाही, तर पृथ्वीला पर्यावरण ऱ्हासाच्या संकटापासून वाचविण्याची वेळ आली आहे. वृक्ष लावा, पृथ्वीला वाचवा हा ऑलंम्पिकचा संदेश आहे.**

**पृथ्वीचा ऱ्हास होण्यापासून वाचविण्याची वेळ आली आहे. त्यासाठी पृथ्वीवर होणारे आक्रमण नुसतेच थांबवायचे नाही, तर पूर्णपणे थांबवायचे आहे. चला, एकत्र येऊन पृथ्वी वाचवूया. आपण प्रत्येकाने एक रोपटे लावण्याचा संकल्प करूया.**

ऑलंम्पिक उदघाटनाच्यावेळी सहभागी खेळाडूंकडून एक बीज लावून घेण्यात आले. सायकल रॅलीमध्ये वृक्षारोपणाचे महत्त्व व पृथ्वीला वाचविण्याचा संदेश देणारा फलक होता. ध्वजवाहकाच्या समोर चालणाऱ्या प्रत्येक मुलाच्या हातामध्ये छोटी रोपे देण्यात आली होती.

वरील संदेश लोकांच्या मनाला भिडणारे असून, त्यातून वृक्ष लागवडीचे महत्त्व अधोरेखित होते. वसुंधरेला वाचविण्याची आर्त हाक त्यातून दिली जात आहे.

६. वर नमूद पार्श्वभूमीवर वृक्षारोपणाची गती तुटू न देता ती पुढे सुरू ठेवणे अत्यंत आवश्यक आहे. त्या अनुषंगाने पुढील ३ वर्षामध्ये ५० कोटी वृक्षारोपणाचे उद्दिष्ट मा. मुख्यमंत्री यांचे मान्यतेने शासनाने संदर्भ क्रमांक -३ येथील महसूल व वन विभागाच्या शासन निर्णयान्वये निश्चित केले आहे. त्याचबरोबर ५० कोटी वृक्षारोपणाच्या अंमलबजावणीबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. वर्ष २०१६ मध्ये वन विभाग व इतर विभाग मिळून अनुक्रमे ७५ टक्के व २५ टक्के उद्दिष्ट दिले होते. त्याच अनुषंगाने पुढील वर्षासाठी उद्दिष्ट निश्चित करण्यात आले आहे. त्याशिवाय ग्रामपंचायतींना त्याच प्रमाणात एकंदर पुढील ३ वर्षांमध्ये १२ कोटी वृक्षारोपणाचे उद्दिष्ट देण्यात आले आहे. त्याचा तपशिल खालीलप्रमाणे:-

| अ.क्र. | वर्ष | प्रस्तावित कालावधी | वन विभाग | इतर विभाग | ग्रामपंचायती | एकूण उद्दीष्ट |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | सन २०१७ | १५ जून ते ०७ जुलै, २०१७ * | २.२५ कोटी | ७५ लक्ष | १ कोटी | ४ कोटी |
| २ | सन २०१८ | १५ जून ते ०७ जुलै,२०१८ * | ७.५० कोटी | २.५० कोटी | ३ कोटी | १३ कोटी |
| ३ | सन २०१९ | १५ जून ते ७ जुलै, २०१९ * | १८.७५ कोटी | ६.२५ कोटी | ८ कोटी | ३३ कोटी |
| | | एकूण | २८.५० कोटी | ९.५० कोटी | १२ कोटी | ५० कोटी |
| | | | एकूण ३८ कोटी | | एकंदर ५० कोटी | |

***	राज्यातील निरनिराळया विभागामध्ये पावसाची सुरूवात आणि आवक सर्वसाधारणपणे १५ जून नंतर वेगवेगळया वेळी होते. त्यामुळे त्या त्या वर्षाच्या पावसाचा अंदाज घेवून विभागनिहाय आणि जिल्हानिहाय दिलेली उद्दिष्टे पूर्ण करण्याबाबत त्या त्या वर्षात परिस्थितीनुसार लवचिकता (Flexibility) ठेवण्यात येईल. तसेच वृक्षरोपणाच्या वर नमूद वृक्षारोपणाच्या कालावधीमधील निश्चित तारखा त्या त्या वर्षाचा पावसाळा सुरु होण्यापूर्वी अगोदर कळविण्यात येतील.**

७.	दि. १ जुलै, २०१६ रोजी झालेल्या वृक्षारोपणामध्ये २१ विभाग सहभागी होते. पुढील काळात जवळपास सर्व ३३ शासकीय विभाग ( संसदीय कार्य विभाग वगळून ) व त्यांच्या अधिपत्याखालील निम शासकीय मंडळे आणि महामंडळे यांचा समावेश या कार्यक्रमात करण्यात आला आहे. त्यानुसार संपूर्ण शासन यंत्रणसे या महत्त्वाकांक्षी कार्यक्रमात समाविष्ट करून घेण्याचा मानस आहे. प्रत्येक विभाग आणि त्या अंतर्गत मंडळे/महामंडळ यांच्या करिता वर नमूद केल्याप्रमाणे उद्दिष्टे निश्चित करताना, जिथे वृक्ष लागवडीस अधिक वाव आहे, ती महत्तम क्षमता विचारात घेतली आहे. त्यानुसार **सार्वजनिक बांधकाम विभागास** संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णय, महसूल व वन विभाग दि. १० ऑक्टोबर, २०१६ मधील **विवरणपत्र क्रमांक ३** मध्ये नमूद आणि मा. मुख्य सचिव आणि मा. मुख्यमंत्री यांच्या मान्यतेनुसार खालीलप्रमाणे उद्दिष्ट आणि वृक्षरोपणाची संभाव्य स्थळे निश्चिती करुन देण्यात आलेली आहेत.

**सन २०१८, २०१७ व २०१९ या पूढील ३ वर्षात विविध विभागांना एकंदर ९.५० कोटी वृक्षारोपणाच्या उद्दिष्टांतर्गत सार्वजनिक बांधकाम विभागास केलेले वर्षेनिहाय वाटप.**

| **वृक्षरोपणासाठी संभाव्य स्थळे** | **सन - २०१७ ( एकूण उद्दिष्ट ७५ लाख )** | **सन - २०१८ ( एकूण उद्दिष्ट २.५ कोटी )** | **सन - २०१९ ( एकूण उद्दिष्ट ६.२५ कोटी )** |
|---|---|---|---|
| १)मुख्य अभियंता, प्रादेशिक विभाग,मुंबई. | १,५०,००० | ४,५०,००० | ११,००,००० |
| २) मुख्य अभियंता, प्रादेशिक विभाग,पुणे. | १,२०,००० | ४,१०,००० | १०,३०,००० |
| ३) मुख्य अभियंता, प्रादेशिक विभाग,नाशिक. | १,२०,००० | ४,१०,००० | १०,३०,००० |
| ४) मुख्य अभियंता, प्रादेशिक विभाग, औरंगाबाद. | १,२०,००० | ४,१०,००० | १०,३०,००० |
| ५) मुख्य अभियंता, प्रादेशिक विभाग,अमरावती. | १,२०,००० | ४,१०,००० | १०,३०,००० |
| ६) मुख्य अभियंता, प्रादेशिक विभाग,नागपूर. | १,२०,००० | ४,१०,००० | १०,३०,००० |
| **एकूण** | **७,५०,०००** | **२५,००,०००** | **६२,५०,०००** |

**सार्वजनिक बांधकाम विभागास** आणि त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय नियंत्रक अधिकाऱ्यांना त्यांना दिलेल्या वृक्ष लागवड उद्दिष्टानुसार क्षेत्रिय यंत्रणांना अंतर्गत वाटप करण्याची पूर्णत: मुभा राहील.

८. महसूल व वन विभागाच्या संदर्भाधिन क्र. ३ येथील दि. १० ऑक्टोबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांनुसार कार्यक्रमाचा सुक्ष्म आराखडा तयार करणे, त्या त्या वर्षातील वृक्ष लागवडीसाठी अक्षांश व रेखांशासह स्थळ निश्चिती करणे, निकषाप्रमाणे खड्डे तयार करणे, जुन-जूलै मधील वृक्ष लागवड, वृक्ष लागवडीचा प्रत्यक्षदर्शी अहवाल (Real Time Reporting) आणि अंतिमत: संगोपन या विषयी सदर शासन निर्णयात विहित केलेल्या कार्यपध्दतीप्रमाणे दिलेल्या कालमर्यादेत कार्यवाही करावी. तसेच ह्याबाबतची माहिती **विवरणपत्र-१ आणि २** मध्ये विहित केलेल्या प्रपत्रात प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), नागपूर व सचिव (वने) यांना पाठविण्यात यावी. तसेच प्रधान सचिव (**सार्वजनिक बांधकाम विभाग** ) यांना **सार्वजनिक बांधकाम** विभागाची माहिती स्वतंत्रपणे पाठवावी.

९. वृक्षारोपणाचा दृश्य परिणाम दिसून येण्यासाठी, संवर्धन, पाणीपुरवठा, जनावरांपासून रोपांचे संरक्षणासाठी जैविक किंवा तारांचे/प्लॅस्टीक कुंपण, कायम स्वरुपी देखभाल, निगा, जोपासना व संगोपन इत्यादी कामांचा नियोजन आराखडा तयार करावा व त्यानुसार कार्यवाही व्हावी. तसेच या वृक्षाचे जिवंत राहण्याचे प्रमाण (Survival rate) किमान ८०% ते ९०% राहणेबाबत काळजी घ्यावी.

१०. या कार्यक्रमांतर्गत होणारा खर्च मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच आवश्यक तेथे सी.एस.आर. फंडातून तरतूद उपलब्ध करुन घ्यावी. जिथे निधीची अडचण असेल त्या ठिकाणी वन व सामजिक वनीकरण विभागामार्फत मोफत रोपे देण्याचा प्रयत्न केला जाईल. त्याबाबतची आवश्यक ती नोंद आणि लेखा इत्यादीबाबत रोपे उपलब्ध करुन घेणारा विभाग आणि रोपे उपलब्ध करुन देणारा विभाग अशा दोनही विभागांमार्फत ठेवण्यात यावा. तसेच ह्याबाबतची माहिती प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर, सचिव (वने) आणि **सार्वजनिक बांधकाम विभागास** पाठविण्यात यावी.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२११७१९५१०६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashish Kumar Singh

Digitally signed by Ashish Kumar Singh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6399d1674d200923dae5766f52f1749e562f0390a4b158b702edba1c7269290a, cn=Ashish Kumar Singh
Date: 2017.01.25 17:08:48 +05'30'

( आशिषकुमार सिंह )
प्रधान सचिव

**सोबत:-**
महसूल व वन विभागाचा दि. १० ऑक्टोबर, २०१६ आणि
दि. ३१ मार्च, २०१६ रोजीचा शासन निर्णय.

**प्रत:-**

१) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
२) सचिव(रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
३) सचिव(बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

४) महाव्यवस्थापक,महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित.
५) सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.
६) सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ.
७) सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग.
८) सर्व सह सचिव/उप सचिव /अवर सचिव , सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
९) निवड नस्ती रस्ते-७.

**सन २०१७ ते २०१९ या वर्षांमध्ये दरवर्षी जून-जुलै महिन्यात एकंदर ३ वर्षाच्या कालावधीमध्ये ५० कोटी वृक्ष लागवडीच्या कार्यक्रमाचा वर्षनिहाय नियोजन आराखडा व कृती कार्यक्रम तयार करुन अंमलबजावणी करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सावनि-२०१६/प्र.क्र. ८०/फ-११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
**दिनांक : १० ऑक्टोबर, २०१६.**

वाचा:-शासन निर्णय,महसूल व वन विभाग क्रमांक्र-सावनि-२०१६/प्र.क्र.१३१/फ-११, दि. ३१.०३.२०१६.(प्रत सोबत)

प्रस्तावना-

जागतिक तापमानातील वाढ, हवामान आणि ऋतू बदल याची दाहकता आणि तीव्रता कमी करण्यासाठी मोठया प्रमाणात वृक्ष लागवड हाती घेण्याचे महत्त्व वैश्विक स्तरावर मान्य झालेले आहे. या उपक्रमाचा भाग म्हणून दि. १ जूलै, २०१६ रोजी एकाच दिवशी २ कोटी वृक्ष लागवड करण्याचा महत्वकांक्षी आणि धडक कार्यक्रम शासनाने हाती घेतला होता. यामध्ये शासनाचे एकंदर २२ विभाग समाविष्ट झाले होते. त्याचबरोबर ह्या कार्यक्रमामध्ये शाळा, महाविद्यालये, विद्यापीठे, एन.एस.एस., एन.सी.सी., स्काऊट अॅन्ड गाईडस्, अशासकीय, स्वयंसेवी आणि सामाजिक क्षेत्रामध्ये काम करणाऱ्या संस्था, औद्योगिक समूह, सीएसआर, लोकप्रतिनिधी, गृहनिर्माण संस्था, सहकारी संस्था, शासकीय कर्मचारी/अधिकारी इत्यादींचा देखील सहभाग होता.

या कार्यक्रमाच्या नियोजनापासून अंमलबजावणी आणि रोपांचे संरक्षण याबाबत अनेक टप्पे घालून देण्यात आले होते. त्यानुसार मार्गदर्शक सूचना महसूल व वन विभागाच्या दि. ३१ मार्च, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आल्या होत्या. त्याचबरोबर सर्व सहभागी २२ प्रशासकीय विभागांना त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय अधिकाऱ्यांना वृक्षारोपणामध्ये सहभागी करून उद्दिष्ट पूर्ण करण्याच्या दृष्टीने सूचना देण्यासाठी परिपत्रकांचे मसुदे वन विभागाने तयार करून दिले होते. त्यानुसार परिपत्रकाद्वारे सविस्तर सूचना संबंधित प्रशासकीय विभागाकडून निर्गमित करण्यात आल्या होत्या.

लोकांच्या स्वयंस्फूर्त सहभागामूळे २ कोटी वृक्षरोपणाचे उद्दिष्ट सहजगत्या पूर्ण झाले. दि. १ जुलै, २०१६ रोजी एकंदर २.८२ कोटी वृक्ष लागवड करण्यात आली. हा कार्यक्रम लोकचळवळीमध्ये रुपांतरीत करण्यास शासनास चांगले यश प्राप्त झाले आहे. मा. पंतप्रधान यांनी दि. ३१ जुलै, २०१६ रोजीच्या "मन की बात" या रेडिओवरून प्रसारित होणाऱ्या कार्यक्रमामध्ये वन विभागामार्फत राबविण्यात आलेल्या २ कोटी वृक्षारोपण कार्यक्रमाच्या अंमलबजावणीबाबत अभिनंदन केले. त्याचबरोबर यापुढील वर्षांमध्ये हाती घेण्यात येणाऱ्या कार्यक्रमाबाबत देखील सुतोवाच केले. त्याशिवाय निरनिराळ्या धर्मग्रंथामध्ये नमूद वृक्ष लागवडीचे महत्त्व विशद केले. त्यानुसार वृक्ष लागवडीच्या कार्यक्रमात सातत्य ठेवणेबाबत आवाहन केले.

त्याचप्रमाणे लिम्का बुक ऑफ रेकॉर्ड या संस्थेने या अभिनव उपक्रमाची नोंद घेऊन राज्य शासनास प्रमाणपत्र दिले आहे. सर्व प्रशासकीय विभागांच्या एकत्रित प्रयत्नामुळे हा आगळावेगळा उपक्रम राबविणे शक्य झाले आहे.

ब्राझील मधील "रिओ दि जानेरो" येथे दि. ६ ऑगस्ट, २०१६ रोजी ऑलंम्पिक सोहळयाचे उदघाटन अत्यंत दिमाखदारपणे संपन्न झाले. ह्या जागतिक सोहळयात २०५ देश समाविष्ट झाले होते. भारतीय खेळाडू देखील मोठया संख्येने यात सहभागी झाले होते. या दिवशी वृक्ष लागवडीचे महत्त्व, पर्यावरणाचे रक्षण आणि जागतिक तापमानात होणारी वाढीची तीव्रता कमी करणे (Mitigation of Global Warming) इत्यादी संदर्भातील महत्त्व विषद करणाऱ्या संदेशांचे दमदार सादरीकरण झाले. त्यानंतर ऑलंम्पिक २०१६ या स्पर्धेची सुरूवात करण्यात आली. यावेळी दिलेले संदेश पुढीलप्रमाणे:-

**"पृथ्वीच्या होत असलेल्या हानीला थांबविणे पुरेसे नाही, तर पृथ्वीला पर्यावरण ऱ्हासाच्या संकटापासून वाचविण्याची वेळ आली आहे. वृक्ष लावा, पृथ्वीला वाचवा हा ऑलंम्पिकचा संदेश आहे."**

**"पृथ्वीचा ऱ्हास होण्यापासून वाचविण्याची वेळ आली आहे. त्यासाठी पृथ्वीवर होणारे आक्रमण नुसतेच थांबवायचे नाही, तर ते पूर्णपणे थांबवायचे आहे. चला, एकत्र येऊन पृथ्वी वाचवूया. आपण प्रत्येकाने एक रोपटे लावण्याचा संकल्प करूया."**

ऑलंम्पिक उदघाटनाच्यावेळी सहभागी खेळाडूंकडून एक बीज लावून घेण्यात आले. सायकल रॅलीमध्ये वृक्षारोपणाचे महत्त्व व पृथ्वीला वाचविण्याचा संदेश देणारा फलक होता. ध्वजवाहकाच्या समोर चालणाऱ्या प्रत्येक मुलाच्या हातामध्ये छोटी छोटी रोपे देण्यात आली होती.

वरील संदेश लोकांच्या मनाला भिडणारे असून, त्यातून वृक्ष लागवडीचे महत्त्व अधोरेखित होते. वसुंधरेला वाचविण्याची आर्त हाक त्यातून दिली जात आहे.

२ कोटी वृक्षारोपणाचा कार्यक्रम लोक चळवळीमध्ये रुपांतरीत करण्याबाबत शासनास चांगले यश प्राप्त झाले आहे. वर नमूद पार्श्वभूमीवर वृक्षारोपणाची ही गती तुटू न देता ती पुढे सुरू ठेवणे अत्यंत आवश्यक आहे. त्यानुसार पुढील ३ वर्षात ५० कोटी वृक्ष लागवडीचा कार्यक्रम हाती घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. प्रस्तावनेत नमूद केलेल्या पार्श्वभूमीवर पुढील ३ वर्षामध्ये ५० कोटी वृक्षारोपणाचे उद्दिष्ट निश्चित करण्यात आले आहे. त्यामध्ये वर्ष २०१६ मध्ये वन विभाग व इतर विभाग मिळून अनुक्रमे ७५ % व २५ % उद्दिष्ट दिले होते. तेच प्रमाण पुढील ३ वर्षाकरिता ठेवण्यात येत आहे. त्याशिवाय ग्रामपंचायतींना त्याच प्रमाणात एकंदर पुढील ३ वर्षामध्ये १२ कोटी वृक्षारोपणाचे उद्दिष्ट देण्यात आले आहे. त्याचा तपशिल खालीलप्रमाणे:-

| अ.क्र. | वर्ष | वृक्षारोपणाचा कालावधी | वन विभाग | इतर विभाग | ग्रामपंचायती | एकूण उद्दीष्ट |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | सन २०१७ | १५ जून ते ०७ जुलै, २०१७ * | २.२५ कोटी | ७५ लक्ष | १ कोटी | ४ कोटी |
| २ | सन २०१८ | १५ जून ते ०७ जुलै,२०१८ * | ७.५० कोटी | २.५० कोटी | ३ कोटी | १३ कोटी |
| ३ | सन २०१९ | १५ जून ते ७ जुलै, २०१९ * | १८.७५ कोटी | ६.२५ कोटी | ८ कोटी | ३३ कोटी |
| | | **एकूण** | **२८.५० कोटी** | **९.५० कोटी** | **१२ कोटी** | **५० कोटी** |
| | | | **एकूण ३८ कोटी** | | **एकंदर ५० कोटी** | |

***** **राज्यातील निरनिराळया विभागामध्ये पावसाची सुरूवात आणि आवक सर्वसाधारणपणे १५ जून नंतर वेगवेगळया वेळी होते. त्यामुळे त्या त्या वर्षाच्या पावसाचा अंदाज घेवून विभागनिहाय आणि जिल्हानिहाय दिलेली उद्दिष्टे पूर्ण करण्याबाबत त्या त्या वर्षात परिस्थितीनुसार लवचिकता (Flexibility) ठेवण्यात येईल. तसेच वृक्षारोपणाच्या वर नमूद वृक्षारोपणाच्या कालावधीमधील निश्चित तारखा त्या त्या वर्षाचा पावसाळा सुरु होण्यापूर्वी अगोदर कळविण्यात येतील.**

२. वर नमूद केल्याप्रमाणे वृक्षारोपणासाठी उंच, कमीत कमी दीड ते दोन वर्ष वयाची दर्जेदार व गुणवत्तापूर्ण आणि पाण्याची उपलब्धता, हवामान, भौगोलिक परिस्थितीशी अनुरूप पण शक्यतो स्थानिक प्रजातीच्या रोपांची उपलब्धता विविध विभाग, खाजगी व्यक्ती/संस्था आणि शेतकरी यांना करावी लागणार आहे. त्यासाठी ५० कोटी अधिक २० टक्के मरअळी (Mortality) धरून एकंदर ६० कोटी रोपे तयार करून उपलब्ध करावी लागतील. त्याकरिता वन, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र वन विकास महामंडळ इ. मार्फत महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना (M-NREGA) आणि इतर योजनांतर्गत निधीतून रोपवाटिका विकसित करण्याबाबत नियोजित आहे. त्याचबरोबर कृषी, जलसंपदा, सार्वजनिक बांधकाम, आदिवासी इ. व अन्य विभागांमार्फत, एम-नरेगा व इतर उपलब्ध निधीतून रोपवाटिका सुरू करण्याबाबत आणि रोपांची उपलब्धता करण्याबाबत त्या विभागांनी कार्यवाही

करावी. तसेच खाजगी आणि अशासकीय संस्था यांच्यामार्फत देखील आवश्यक असल्यास रोपांची उपलब्धता करुन घेण्यात यावी.

३. दिनांक १ जुलै, २०१६ रोजी यशस्विरित्या अंमलबजावणी केलेला २ कोटी वृक्ष लागवडीचा कार्यक्रम पुढे अधिक गतीने आणि परिणामकारकरित्या सुरू ठेवण्यासाठी वन विभागाने ३३ कलमी कार्यक्रम तयार केला आहे. त्यामध्ये रोपवाटिका विकसित करण्यापासून वन आणि वनेत्तर (Non-forest) क्षेत्रे यांची उपलब्धता, केंद्र शासनाकडील रेल्वे, राष्ट्रीय महामार्ग, संरक्षण, केंद्रीय सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्याबरोबरच राज्य शासनाच्या महसूल विभागांतर्गत उपलब्ध जागा वृक्ष लागवडीसाठी प्राप्त करून घेणे, जलयुक्त शिवार अभियानास बांबू मिशनची जोड देणे इत्यादी अनेक महत्त्वपूर्ण योजनांचा समावेश आहे. या संदर्भात प्रत्येक विषयाबाबत अधिकाऱ्यांचे छोटे गट स्थापित करून सविस्तर प्रस्ताव तयार करून पुढील कार्यवाही करण्यात येत आहे.

४. दि.१ जुलै, २०१६ रोजीच्या वृक्षारोपण कार्यक्रमाचे वृक्ष लागवडीपासून संगोपनापर्यंत नियोजन, अंमलबजावणी आणि सनियंत्रण याकरिता राज्य, जिल्हा, तालुका आणि ग्राम स्तरावर समित्या स्थापित करण्यात आल्या आहेत. त्याच समित्या पुढील ३ वर्षाच्या कालावधीमध्ये **स्थायी समित्या** म्हणून कार्यरत राहतील. या समित्यांमध्ये वन, वन्यजीव, जैवविविधता, पर्यावरण आणि निसर्ग इत्यादी क्षेत्रात काम करणाऱ्या संस्था यांचे सदस्य किंवा अध्यक्ष यांच्यापैकी एका तज्ञाचा समावेश जिल्हा, तालुका आणि ग्रामस्तरावरील समित्यांमध्ये सदस्य म्हणून करण्यात यावा. तसेच लायन्स/रोटरी क्लब व जे.सी.आय. व इतर अशासकीय/खाजगी संस्था, यांच्या एका सदस्याचा देखील सहभाग ठेवावा. सदर सदस्य निवडीचे अधिकार जिल्हा व तालुकास्तरावर अनुक्रमे संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी, उप विभागीय अधिकारी यांना राहतील. ग्रामस्तरावरील समितीमध्ये वन, वन्यजीव, जैवविविधता, सामाजिक वनीकरण, निसर्ग, पर्यावरण इत्यादी क्षेत्रात काम करणाऱ्या व्यक्ती/संस्था यापैकी एक तज्ञाची सदस्य म्हणून नेमणूक करण्याचे अधिकार तालुका गट विकास अधिकारी यांना राहतील. तसेच जिल्हा व तालुका स्तरावर मा. पालकमंत्री व खासदार आणि संबंधित तालुक्याचे आमदार ह्यांना आवश्यक त्यावेळी विशेष निमंत्रित म्हणून अशा बैठकांना बोलविण्यात यावे. त्याप्रमाणे अनुक्रमे जिल्हाधिकारी व उप विभागीय अधिकारी (महसूल) ह्यांनी कार्यवाही करावी.

५. जिल्हाधिकारी व उपविभागीय अधिकारी ह्यांचे अध्यक्षतेखालील समित्यांमध्ये **सदस्य-सचिव** म्हणून अनुक्रमे जिल्हा आणि तालुका मुख्यालयाच्या ठिकाणचे उप वनसंरक्षक व वनक्षेत्रपाल हे राहतील. बीड, उस्मानाबाद, हिंगोली, परभणी, रत्नागिरी आणि सांगली येथे उप वनसंरक्षक हे पद नसल्याने तिथे जिल्हा समित्यांवर विभागीय वन अधिकारी हे **सदस्य - सचिव** म्हणून राहतील. तथापि, वृक्षारोपण कार्यक्रमाचे संपूर्ण समन्वय व विविध विभागाशी संपर्क साधून माहिती वेळोवेळी प्राप्त करण्यामध्ये उप वनसंरक्षक, विभागीय वन अधिकारी, उपसंचालक, सामाजिक वनीकरण, वनक्षेत्रपाल, लागवड अधिकारी, सामाजिक वनीकरण हे एकमेकांशी उत्तम सहकार्य ठेवून काम करतील.

**दिनांक ३१ मार्च, २०१६ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे गठीत केलेल्या राज्य, जिल्हा, तालुका आणि ग्रामस्तरावर नमूद समित्यांच्या रचनेत वरील परिच्छेदात नमूद केल्याप्रमाणे बदल होईल. तथापि, या सर्व समित्यांच्या कार्यकक्षा दिनांक ३१ मार्च, २०१६ रोजीच्या शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे राहतील.**

६. त्याचप्रमाणे जिल्हा, तालुका आणि ग्रामस्तरावरील बैठकांची वारंवारता (Frequency) सर्वसाधारणपणे दर महिन्यातून एकदा असावी. अशा बैठका प्रत्येक महिन्याच्या पहिल्या आठवड्यातील सोमवारी आयोजित कराव्यात. या बैठकांमध्ये घेतलेल्या निर्णयांची माहिती (Real Time Reporting) वन विभागाच्या www.mahaforest.nic.in या संकेतस्थळावर टाकण्यासंदर्भात अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती तंत्रज्ञान आणि प्रसिध्दी), नागपूर यांच्यामार्फत आज्ञावली (Software) विकसित करण्यात येत आहे. अशा बैठकांमध्ये घेतलेल्या निर्णयांबाबत जनतेकडून सूचना प्राप्त करून घेणे किंवा काही नाविन्यपूर्ण संकल्पना सूचविणे हा उद्देश आहे. अशा सूचनांचा आणि संकल्पनांचा विचार पुढील बैठकांमध्ये विचार व्हावा. जेणेकरून या कार्यक्रमात जनसहभाग वाढवून या कार्यक्रमाला लोकचळवळीचे स्वरूप देण्याचा उद्देश सफल होईल. तसेच या कार्यक्रमाचा सचिव ( वने ) हे सातत्याने आढावा घेतील. दर महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यात सर्व जिल्हाधिकारी, उप विभागीय अधिकारी, वन विभागाचे

सर्व संबंधित अधिकारी, जिल्हा, तालुका आणि ग्रामस्तरावरील विविध प्रशासकीय विभागांचे " समन्वय अधिकारी" यांच्याशी सचिव ( वने ) हे व्हिडीओ कॉन्फरन्सींगद्वारे संवाद साधतील.

७. जिल्हा व तालुकास्तरावरील समितीच्या बैठकांचे कार्यवृत्त (Agenda) सर्वसाधारणपणे काय असावे यासंदर्भात देखील काही मार्गदर्शक तत्वे स्वतंत्रपणे घालून देण्यात येतील. राज्यातील ३६ जिल्हे, ३५८ तालुके आणि २७,५०० ग्रामपंचायतीमधील या समित्यांचे सदस्य-सचिव आणि समन्वय अधिकारी यांची नांवे, मोबाईल नंबर असलेली पुस्तिका प्रत्येक प्रशासकीय विभागांतर्गत क्षेत्रिय प्रमुख यंत्रणेने आधीपासूनच तयार करून जनतेच्या माहितीसाठी दि. ३० नोव्हेंबर, २०१६ पर्यंत प्रसिध्द करावी. जेणेकरून वृक्षारोपण कार्यक्रमाबाबत लोकांना काही माहिती किंवा शंका असल्यास त्याचे निराकरण करण्यास मदत होईल. अधिकाऱ्यांच्या जरी बदल्या झाल्या तरी नवीन येणाऱ्या अधिकाऱ्यास आधीचे निर्णय पुढे सुरु ठेवण्यासाठी अडचण येणार नाही, अशा रितीने या स्थायी समित्यांची कार्यपध्दती ठेवण्यात यावी

८. वृक्ष लागवडीच्या एकंदर उद्दिष्टांमध्ये कमीत कमी १० टक्के बांबू प्रजातींची लागवड व्हावी. त्यानुसार सर्व विभागांच्या रोपवाटिकांमध्ये विविध बांबू प्रजातींची रोपे विकसित करण्याबाबत कार्यवाही व्हावी. जेणेकरून वृक्षछाया वाढविण्याबरोबरच गरीब, अनुसूचित जाती आणि अनुसूचित जमाती व इतर लोकांना रोजगाराची, उपजिविकेची आणि उत्पन्नाची साधने उपलब्ध होण्यास मदत होऊ शकेल.

९. केंद्र शासनाकडील रेल्वे, राष्ट्रीय महामार्ग, संरक्षण आणि केंद्रीय सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्याकडे किती जागा उपलब्ध होईल, याची जिल्हानिहाय माहिती संकलित करावी लागेल. त्याचबरोबर महसूल विभागांतर्गत मोकळया आणि पडीक जागा, राज्यातील इतर शासकीय, निमशासकीय विभाग, महामंडळे/मंडळे आणि इतर संस्था यांच्याकडे जिल्हानिहाय किती जागा उपलब्ध होऊ शकेल, याचा देखील अंदाज घ्यावा लागेल. त्यानुसार या सर्व जमिनींच्या उपलब्धतेबाबत सर्वेक्षण आणि क्षेत्र/स्थळ निश्चिती याचा डेटा बेस जिल्हाधिकारी यांनी दि. ३० नोव्हेंबर, २०१६ पूर्वी तयार करण्याबाबत शासन, महसूल व वन विभाग पत्र क्र. सावधि-२०१६/ प्र.क्र.११९/फ-११, दि. १७/०९/२०१६ आणि दिनांक २२/०९/२०१६ अन्वये जिल्हाधिकारी यांना स्वतंत्रपणे सूचना दिल्या आहेत.

१०. वर नमूद केल्याप्रमाणे जिल्हाधिकाऱ्यांनी जागा उपलब्धतेबाबत डेटा बेस तयार झाल्यावर वृक्ष लागवडी अंतर्गत प्रत्येक विभागाने जिल्हा, तालुका आणि ग्रामस्तरावरील समित्यांमार्फत दि. ३१ डिसेंबर पर्यंत कार्यक्रमाचा सुक्ष्म आराखडा (Micro Plan) तयार करावा. संपूर्ण कार्यक्रमाचे पर्यवेक्षण व सनियंत्रण जिल्हाधिकारी यांनी करावे. असा सूक्ष्म आराखडा तयार करताना, वन विभागाने विकसित केलेल्या जिओ टॅगिंग (Geo-Taging) या संगणकीय प्रणालीद्वारे अक्षांश व रेखांश यासह स्थळ निश्चिती, योग्य रोपांची उपलब्धता, मनुष्यबळाची निश्चिती, शासकीय व निम शासकीय यंत्रणा/खाजगी व्यक्ती व संस्था/विद्यार्थी व स्वयंसेवक इत्यादींशी संपर्क साधून त्यांना सक्रीय करणे, वृक्ष लागवडीच्या कालावधीमध्ये प्रत्येक दिवशी किती वृक्षारोपण होणार याचा आराखडा आणि या संदर्भातील प्रत्यक्षदर्शी अहवाल (Real Time Reporting) व अंतिमत: संगोपनाचा अहवाल विहित संगणकीय प्रणालीमध्ये भरणे इत्यादी व अनुषंगिक विषयांचा समावेश असेल.

११. दि. १ जुलै, २०१६ रोजी झालेल्या वृक्षारोपणामध्ये २१ विभाग सहभागी होते. या वर्षी जवळपास सर्व ३३ शासकीय विभाग (संसदीय कार्य विभाग वगळून) व त्यांच्या अधिपत्याखालील निम शासकीय महामंडळे आणि मंडळे यांचा समावेश या कार्यक्रमात करण्यात आला आहे. त्यानुसार संपूर्ण शासन यंत्रणसे या महत्त्वाकांक्षी कार्यक्रमात समाविष्ट करून घेण्याचा मानस आहे. प्रत्येक विभाग आणि त्या अंतर्गत मंडळे/महामंडळे यांच्याकरिता उद्दिष्ट निश्चित करताना, जिथे वृक्ष लागवडीस अधिक वाव आहे, ती महत्तम क्षमता विचारात घेतली आहे. त्यानुसार कृषी, नगरविकास, जलसंपदा, सार्वजनिक बांधकाम, सहकार इत्यादी विभागांना जास्तीचे उद्दिष्ट देण्यात आले आहे. इतर विभागांना उद्दिष्ट देताना त्यांचेकडील क्षेत्रीय आस्थापना आणि जागांची मर्यादा ह्यांचा विचार करुन उद्दिष्ट वाटप केले आहे. त्यानुसार सर्व विभागांना आणि त्यांच्या अधिपत्याखालील मंडळे/महामंडळांना द्यावयाचे

उद्दिष्ट, संभाव्य वृक्षारोपण स्थळे व पुढील ३ वर्षातील वृक्ष लागवडीचे उद्दिष्ट हयांची माहिती **विवरणपत्र क्र. ३** मध्ये दिली आहे. प्रत्येक विभागाने आणि त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय नियंत्रक अधिकाऱ्यांनी त्यांना दिलेल्या उद्दिष्टानुसार क्षेत्रिय यंत्रणांना अंतर्गत वाटप करण्याची पूर्णत: मुभा राहील. दिलेले उद्दिष्ट कशारितीने गाठावयाचे याबाबत संबंधित विभाग आणि त्यांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख निर्णय घेतील.

१२. त्याचप्रमाणे ग्रामपंचायतींना वर्ष २०१७ ते २०१९ पर्यंत अनुक्रमे १ कोटी, ३ कोटी आणि ८ कोटी वृक्ष लागवडीचे ग्रामपंचायतीनिहाय वर्षेवार वाटप **विवरणपत्र क्र. ४** मध्ये दिले आहे. प्रत्येक ग्रामपंचायतीला दिलेले उद्दिष्ट गाठण्याकरिता सर्व ग्रामपंचायतींना वन विभाग, सामाजिक वनीकरण आणि वन विकास महामंडळ या विभागाकडून रोपनिर्मिती करून रोपांचा पुरवठा वन विभागामार्फत करण्यात येईल. ग्रामपंचायतीने वृक्ष लागवडीसाठी क्षेत्र आणि स्थळ निश्चिती केल्यानंतर प्रत्यक्ष लागवडीच्या दिवशी किंवा १ ते २ दिवस अगोदर वाहन उपलब्धतेनुसार रोपवाटिकेपासून वृक्षारोपण करावयाच्या ठिकाणापर्यंत रोपांच्या वाहतूकीची जबाबदारी वन विभागाची राहील. त्यासाठी लागणारा अतिरिक्त खर्च शासनास सोसावा लागेल. त्यानुसार वन विभागास अतिरिक्त आर्थिक तरतूद देण्यात येईल. **ग्रामपंचायतीमार्फत होणाऱ्या वृक्षारोपणाचे नियंत्रण, संनियंत्रण आणि अंमलबजावणी ग्राम विकास विभागामार्फत केली जाईल.**

१३. वन विभागाने विकसित केलेल्या जिओ टॅगिंग (Geo-Taging) या संगणकीय प्रणालीद्वारे अक्षांश व रेखांश यासह रोपे लागवडीसाठी वर नमूद केल्याप्रमाणे स्थळ निश्चिती आणि इतर कार्यवाही पूर्ण झाल्यावर खड्डे खोदणे ते माती, खत, किटकनाशके यांनी भरून तयार ठेवण्याबाबत दि. ३१ मार्च पर्यंत कार्यवाही करावी. त्यानंतर वृक्षारोपण आणि रोपांचे जगण्याचे प्रमाण ८० ते ९० % राहण्याच्या दृष्टीने संगोपन इत्यादी संदर्भातील माहिती यापूर्वीच्या दिंनाक ३१ मार्च, २०१६ रोजीच्या शासन निर्णयाप्रमाणेच पुन्हा या शासन निर्णयासोबत जोडलेल्या **विवरणपत्र-१ व विवरणपत्र-२** मध्ये संबंधित कार्यालयांना सादर करण्यात यावी. कार्यक्रमाची विहित कालमर्यादेत अंमलबजावणी करण्यामध्ये अडचणी राहणार नाहीत, हा त्यामागील उद्देश आहे.

**(उदा. २०१७ मधील वृक्षारोपणासाठी वर नमूद विविध टप्प्यांसाठी स्थळ निश्चितीचा डाटाबेस तयार करणे- ३० नोव्हेंबर, २०१६, वृक्षारोपण कार्यक्रमाचा सुक्ष्म प्लॅन तयार करणे- ३१ डिसेंबर २०१६ आणि खड्डे तयार करून माती, खत, किटकनाशके इत्यादींनी भरून तयार ठेवणे- ३१ मार्च, २०१७ असा राहील. पुढील २०१८ आणि २०१९ या वर्षांसाठी देखील त्या त्या वर्षात आणि त्याआधी करावयाच्या कार्यवाहीसाठी अशीच कालमर्यादा राहील).**

१४. प्रत्येक प्रशासकीय विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालयांतर्गत विभाग प्रमुख, विभागीय आयुक्त (महसूल) आणि प्रत्येक जिल्ह्याचे पालक सचिव यांनी दर ३ महिन्यांनी या संदर्भातील कार्यक्रमाचा आढावा घ्यावा व सनियंत्रण करावे. राज्यस्तरीय समितीमार्फत देखील या कार्यक्रमाचा वेळोवेळी आढावा घेण्यात येईल. आवश्यकतेनुसार यापेक्षा कमी कालावधीत देखील सातत्याने सनियंत्रण करता येऊ शकेल. त्यासाठी व्हिडिओ कॉन्फरन्सिंग यंत्रणेचा प्रभावीपणे उपयोग करण्यात यावा.

१५. पुढील ३ वर्षातील वृक्षारोपण कार्यक्रमांतर्गत वृक्षारोपणापूर्वीची कामे, रोपांची उपलब्धता, प्रत्यक्ष वृक्षारोपण आणि वृक्ष जगण्याची यशस्वितता याबाबत संबंधित विभागाच्या क्षेत्रीय अधिकाऱ्यांना व इतरांना आवश्यकतेनुसार तांत्रिक सल्ला व मार्गदर्शन वन व सामाजिक वनीकरण विभागांतर्गत "समन्वय अधिकारी" आणि "स्थानिक अधिकारी" करतील. त्या अनुषंगाने प्रत्येक प्रशासकीय विभागांतर्गत जिल्हा व तालुकानिहाय "समन्वय अधिकारी" हे वन व सामाजिक वनीकरण विभागाच्या संबंधित अधिकाऱ्यांबरोबर उत्तम सहकार्य ठेवतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१६१०१४१४४८५९१३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2016.10.17 16:53:14 +05'30'

(डी. एल. थोरात)
सह सचिव (वने)

**सोबत:-**

१) विवरणपत्र-१
२) विवरणपत्र-२
३) विवरणपत्र-३
४) विवरणपत्र -४
५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, दि. ३१ मार्च २०१६.

**प्रत :-**

१) मा. मुख्य सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
४) अपर मुख्य सचिव व मुख्य राज शिष्टाचार अधिकारी आणि राज्य उत्पादन शुल्क, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव, गृह विभाग (परिवहन व बंदरे), मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) अप्पर मुख्य सचिव, वैद्यकिय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
९) अप्पर मुख्य सचिव, प्रशासकीय सुधारणा, र व का, साप्रवि, मंत्रालय, मुंबई
१०) अप्पर मुख्य सचिव, मदत व पुनर्वसन, मंत्रालय, मुंबई
११) अप्पर मुख्य सचिव, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई
१२) प्रधान सचिव (व्यय) वित्त विभाग, मंत्रालय मुंबई
१३) प्रधान सचिव (लेखा व कोषागरे) वित्त विभाग, मंत्रालय मुंबई
१४) प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग (सेवा), मंत्रालय, मुंबई
१५) प्रधान सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) प्रधान सचिव, महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) प्रधान सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) प्रधान सचिव, नगरविकास विभाग-१, मंत्रालय, मुंबई
१९) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२०) सचिव, नगरविकास विभाग-२, मंत्रालय, मुंबई
२१) प्रधान सचिव, कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई
२२) प्रधान सचिव, पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२३) प्रधान सचिव, उर्जा विभाग, मंत्रालय, मुंबई
२४) प्रधान सचिव, सहकार विभाग, मंत्रालय, मुंबई

२५) प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
२६) सचिव ( प्रकल्प ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२७) सचिव ( अपिल व सुरक्षा ),गृहविभाग विभाग, मंत्रालय, मुंबई
२८) प्रधान सचिव, पणन विभाग, मंत्रालय, मुंबई
२९) प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३०) प्रधान सचिव, उर्जा विभाग, मंत्रालय, मुंबई
३१) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३२) प्रधान सचिव, उदयोग विभाग, मंत्रालय, मुंबई
३३) प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
३४) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
३५) प्रधान सचिव, अन्न व नागरी पुरवठा विभाग, मंत्रालय, मुंबई
३६) प्रधान सचिव ( विशेष ), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
३७) प्रधान सचिव, अल्पसंख्याक विभाग, मंत्रालय, मुंबई
३८) सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
३९) सचिव, कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
४०) सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
४१) सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४२) सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४३) सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
४४) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४५) सचिव, जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
४६) सर्व विभागीय आयुक्त ( महसूल )
४७) आयुक्त, सर्व महानगरपालिका
४८) सचिव ( रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
४९) सचिव ( बांधकाम ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
५०) सचिव ( प्रकल्प ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
५१) सचिव ( लाभक्षेत्र विकास ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
५२) सर्व जिल्हाधिकारी
५३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
५४) सर्व पोलिस अधिक्षक/पोलिस आयुक्त
५५) प्रधान मुख्य वनसंरक्षक ( वन बल प्रमुख ), महाराष्ट्र राज्य,नागपूर
५६) प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण ,महाराष्ट्र राज्य,पुणे
५७) सर्व प्रधान मुख्य वनसंरक्षक.
५८) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक.
५९) सर्व मुख्य वनसंरक्षक ( प्रादेशिक ).
६०) सर्व मुख्य वनसंरक्षक व प्रकल्प संचालक, वन्यजीव.
६१) वन संरक्षक, सामाजिक वनीकरण वृत्त, कोकण, ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर
६२) सर्व सह संचालक, उच्च व तंत्रशिक्षण
६३) सर्व परिवहन अधिकारी
६४) सर्व उपवनसंरक्षक, वन विभाग

३५) सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग
३६) सर्व विभागीय वन अधिकारी
३७) सर्व सहायक वनसंरक्षक
३८) सर्व जिल्हा शिक्षण अधिकारी (प्राथमिक) व ( माध्यमिक )
३९) सर्व जिल्हा उद्योग अधिकारी
४१) सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग ( जिल्हास्तर )
४२) सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग ( जिल्हास्तर )
४३) सर्व कार्यकारी अभियंता महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी
४४) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी
४५) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक
४६) सर्व सहायक धर्मादाय आयुक्त (जिल्हास्तर )
४७) सर्व जिल्हा निबंधक सहकारी संस्था
४८) सर्व प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास ( जिल्हास्तर )
४९) सर्व जिल्हा कृषी अधिकारी
५०) सर्व मुख्याधिकारी नगरपालिका
५१) सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी
५२) सर्व जिल्हा माहिती अधिकारी
५३) सर्व उपविभागीय अधिकारी (महसूल ), संबंधित तालुका
५४) सर्व तहसीलदार
५५) सर्व गट विकास अधिकारी, पंचायत समिती
५६) सर्व पोलीस निरिक्षक, तालुका पोलीस स्टेशन
५७) सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका
५८) सर्व व्यवस्थापक, तालुका एस.टी. बस स्थानक
५९) सर्व वनक्षेत्रपाल, वन विभाग
६०) सर्व उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग
६१) सर्व उप अभियंता, जलसंपदा विभाग
६२) सर्व उप अभियंता, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती/पारेषण/वितरण कंपनी
६३) सर्व वैद्यकीय अधिक्षक, तालुका ग्रामिण रुग्णालये
६४) सर्व वैद्यकीय अधिकारी, तालुका प्राथमिक आरोग्य केंद्रे
६५) सर्व सहाय्यक निबंधक सहकारी संस्था, सहकार विभाग
६६) सर्व तालुका कृषी अधिकारी
६७) सर्व गट शिक्षण अधिकारी
६८) सर्व प्रकल्प अधिकारी एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, आदिवासी विभाग
६९) सर्व लागवड अधिकारी, ( वनक्षेत्रपाल)
७०) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७१) निवडनस्ती/फ-११.

